अकोला महानगरपालिका स्थायी समिती पारित केलेले ठराव क्र.३ दिनांक २१/९/२०१६ महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम कलम ४५१ अन्वये निलंबीत करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- अकोला-२०१६/प्र.क्र.१२०/नवि-२६**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०६ जानेवारी, २०१७

**वाचा** :- अकोला महानगरपालिकेचे पत्र क्र.अमनपा/साप्रवी/आस्था/५०५/२०१६, दिनांक ०१/१०/२०१६

**प्रस्तावना :-**

आयुक्त, अकोला महानगरपालिका यांच्या संदर्भाधीन पत्रान्वये अकोला महानगरपालिका कर्मचाऱ्यांचे कामबंद आंदोलनाची नोटीस देवून दि.२५/०५/२०१६ ते दि.०७/०६/२०१६ पर्यंत संप पुकारण्यात आला होता. शासनाने NO Work No Pay या धोरणानुसार संप कालावधीतील कर्मचाऱ्यांचे वेतन कपात करण्याबाबत प्रशासनाकडून आदेश निर्गमीत करण्यात आला. सदर आदेश विरुध्द संघर्ष समितीने स्थायी समितीकडे अपिल केले. त्या अनुषंगाने स्थायी समितीने सदरचा विषय वेळेवर येणाऱ्या विषयात घेवून ठराव क्रमांक ३ दि.२१/०९/२०१६ अन्वये संपकाळातील पगार कपातीच्या आदेशास स्थगित करण्याबाबत ठराव पारित केला आहे.

महासभेने पारित केलेल्या ठरावानुसार कार्यवाही करणे हे १३ व्या वित्त आयोगाच्या मार्गदर्शक तत्वात बसणारे नसल्याने प्रशासनास शक्य होणार नाही. तरी, स्थायी समिती ठराव क्र.३ दि.२१/०९/२०१६ हा महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील प्रकरण अठ्ठावीस कलम ४५१ नुसार विखंडीत करण्यात यावा, असे आयुक्त, अकोला महानगरपालिका यांनी शासनाकडे पाठविलेल्या प्रस्तावावर निर्णय घेण्याचा प्रस्ताव शासनस्तरावर विचाराधीन होता. या अनुषंगाने शासनाने खालील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

अकोला, महानगरपालिका स्थायी समितीने पारित केलेले ठराव क्र. ३ दि. २१/९/२०१६ हा महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाचे कलम ४५१ (१) नुसार तात्पुरता निलंबित झाल्याचे मानण्यात येत आहे.

तथापि, यावर महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाचे कलम ४५१(२) नुसार आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्यात आयुक्त, अकोला महानगरपालिका तसेच महापालिका यांना अभिवेदन करण्यास संधी देण्यात येत आहे. विहीत मुदतीत अभिवेदन प्राप्त न झाल्यास, या अधिनियमातील कलम ४५१(३) नुसार पुढील कार्यवाही करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१०६११५४५६१९२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jayasingrao N Patil

Digitally signed by Jayasingrao N Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Jayasingrao N Patil
Date: 2017.01.06 11:59:13 +05'30'

(ज.ना.पाटील)
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.महापौर, अकोला महानगरपालिका, अकोला, द्वारा आयुक्त, अकोला महानगरपालिका,
२) आयुक्त, अकोला महानगरपालिका, अकोला
३) सचिव (नवि-२) यांचे वि.का.अ.
४) उप सचिव (नवि-२६), नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) निवडनस्ती, कार्यासन नवि-२६.